**नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेअंतर्गत पात्र लाभार्थ्यांना सहाव्या हप्त्याचा लाभ व यापूर्वीचे प्रलंबित दायित्व अदा करण्यासाठी रू.१६४२.१८ कोटी इतका निधी वितरीत करणेबाबत..**

---

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक पूरक-२०२४/प्र.क्र.१३२/११-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २६ मार्च, २०२५

वाचा :-

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.किसनि- २०२३/ प्र.क्र.४२/११-अे, दि.१५.६.२०२३.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.पीएफएम-२०२३/प्र.क्र.७२/२-अे, दि.२८.७.२०२३
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.पूरक-२०२३/प्र.क्र.८३/११-अे, दि.१०.१०.२०२३
४) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.पूरक-२०२३/प्र.क्र.२२९/११-अे, दि.२१.२.२०२४
५) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.पूरक-२०२३/प्र.क्र.२२९/११-अे, दि.२३.२.२०२४
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.७.२०२४
७) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.पूरक-२०२४/प्र.क्र.१३२/११-अे, दि.२०.८.२०२४
८) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.पूरक-२०२४/प्र.क्र.१३२/११-अे, दि.३०.९.२०२४
९) संचालक(वि.प्र.), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.कृ.गणना/न.शे.म.नि./ले.शि. २४०१बी४५५/ला.अ.सन २४-२५/६०१३/२०२५, दि.१३.३.२०२५

प्रस्तावना :-

सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीय भाषणामध्ये प्रधानमंत्री किसान सन्मान निधी योजनेत राज्य शासनाच्या अनुदानाची भर घालणारी, “नमो शेतकरी महासन्मान निधी” ही योजना घोषित करण्यात आली. त्यास अनुसरुन केंद्र शासनाच्या प्रधानमंत्री किसान सन्मान निधी योजने अंतर्गत देण्यात येणा-या प्रति वर्ष, प्रति शेतकरी रु.६०००/- या अनुदानामध्ये राज्य शासनाची आणखी रु.६०००/- इतक्या निधीची भर घालणारी “नमो शेतकरी महासन्मान निधी” ही योजना राबविण्यास संदर्भ क्र.(१) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच, सदर योजने अंतर्गत लाभार्थीना लाभ अदा करणेसाठी एक व राज्यस्तरावर स्थापन करण्यात येणा-या राज्य प्रकल्प संनियंत्रण कक्षाच्या प्रशासकीय खर्चासाठी एक अशी एकूण दोन स्वतंत्र बचत खाती उघडण्यास संदर्भ क्र.(२) येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेअंतर्गत लाभार्थ्यांना लाभ अदा करण्यासाठी पहिला हप्ता, दुसरा हप्ता, तिसरा हप्ता, चौथा हप्ता तसेच, पाचवा हप्ता अनुक्रमे संदर्भ क्र.(३), (४), (५) (७) व (८) अन्वये वितरीत करण्यात आला आहे. संदर्भ क्र.(९) येथील पत्रान्वये, सन २०२४-२५ मध्ये नमो शेतकरी महासन्मान

निधी योजनेच्या लेखाशिर्षा अंतर्गत मंजूर तरतूदीमधून प्रस्तुत योजनेअंतर्गत, सहावा हप्ता (माहे डिसेंबर २०२४ ते मार्च २०२५) व यापूर्वीच्या हप्त्यांमधील प्रलंबित दायित्व लाभार्थ्यांना अदा करण्यासाठी निधी मागणी प्रस्ताव शासनास सादर झाला आहे. त्यानुसार, कृषि आयुक्तालयाकडे यापुर्वीच्या हप्तासाठी वितरीत निधीपैकी शिल्लक असलेल्या रु.६५३.५० कोटी निधी व्यतिरिक्त रक्कम रू.१६४२.१८ कोटी इतका निधी वितरीत करण्याची विनंती कृषि आयुक्तालयाकडून प्राप्त झाली आहे. त्यास अनुसरुन, नमो शेतकरी महासन्मान निधी योजने अंतर्गत पात्र लाभार्थ्यांना लाभ अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नमो शेतकरी महासन्मान निधी योजनेअंतर्गत, सहावा हप्ता (माहे डिसेंबर २०२४ ते मार्च २०२५) व यापूर्वीच्या हप्त्यांमधील प्रलंबित दायित्व लाभार्थ्यांना अदा करण्यासाठी रू.१६४२.१८ कोटी इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत खर्च पुढील लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करिता मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा -

**मागणी क्र. डी -३**
**२४०१ - पीक संवर्धन**
**००**
**११५, लहान/सीमान्त शेतक-यांची आणि शेतमजुरांची योजना**
**(००)**
**(००)(०६) - नमो शेतकरी महासन्मान निधी योजना**
**(१००% राज्य योजना) (कार्यक्रम)**
**(२४०१ B४५५), ३३-अर्थसहाय्य**

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी संदर्भ क्र. (१) च्या शासन निर्णयात नमूद व शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय /परिपत्रकांमधील तरतूदीनुसार विहित कार्यपद्धतीने खर्च करण्याची, प्रस्तावाधीन रक्कम योग्य लाभार्थ्यांपर्यंत अदा करण्याची, तसेच, सदर प्रकरणी कोणतीही अनियमितता होणार नाही, याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. उपरोक्तप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र आयुक्त (कृषि) शासनास सादर करतील.

५. प्रस्तुत योजनेच्या प्रयोजनार्थ आयुक्तालय स्तरावर, आयुक्त (कृषि) यांना, नियंत्रण अधिकारी व सहाय्यक संचालक, लेखा-१, यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

६. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे अनौसं. क्रमांक १३२/का.१४३१, दि.१२.३.२०२५ व अनौसं. क्रमांक १०९/२०२५/व्यय-१, दि.२४.३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०२५०३२६१९२१००८८०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE Date: 2025.03.26 19:21:56 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
५. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
६. सर्व मा.विधानसभा / मा. विधानपरिषद सदस्य
७. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१०. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१२. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
१३. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१४. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१५. सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
१६. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७. सर्व जिल्हाधिकारी
१८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१९. सर्व विभागीय कृषि सहसंचालक
२०. सर्व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी
२१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा ), मुंबई.
२२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई
२३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरीक्षा ), नागपूर
२४. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
२५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२८. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२९. सर्व तहसिलदार
३०. सर्व तालुका कृषि अधिकारी
३१. निवडनस्ती, कार्यासन ११-अे.